**राज्यातून व विभागातून इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत सर्वप्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या गुणवंत विद्यार्थी व विद्यार्थीनींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१३/प्र.क्र.६५ /विजाभज-१,**
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ४ मार्च, २०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील विमुक्त् जाती व भटक्या जमातीच्या मुला-मुलींना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणणे, त्यांची शैक्षणिक प्रगती करणे व त्यांना उच्च शिक्षणासाठी प्रोत्साहित करणे यासाठी राज्य शासनातर्फे या समाजातील गुणवंत विद्यार्थ्यांना स्व.वसंतराव नाईक यांच्या नावाने पुरस्कार देण्याकरिता शासन प्रयत्नशील होते. त्यामुळे राज्यातून व विभागातून इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेत सर्वप्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या गुणवंत विदयार्थी व विद्यार्थीनींना स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार देऊन त्यांचा गौरव करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

यासंदर्भात या विभागातर्फे समक्रमांकाचा दिनांक २५/२/२०१५ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयात काही सुधारणा करणे आवश्यक वाटल्याने सदरहू शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. राज्यातून व विभागातून माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळाच्या इयत्ता १० वी व १२ वी च्या परिक्षेमध्ये सर्वप्रथम येणाऱ्या विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गाच्या विद्यार्थी व विद्यार्थीनींना सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून स्व.वसंतराव नाईक गुणवत्ता पुरस्कार सन २०१७-१८ यावर्षी दि.१ जुलै रोजी किंवा शासनाने निश्चित केलेल्या दिनांकास प्रदान करण्यास शासनाची पुढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये राज्यात सर्वप्रथम आलेला विदयार्थी/ विदयार्थीनी | प्रत्येकी रुपये एक लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| २) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १० वी परिक्षेमध्ये विभागीय परिक्षा मंडळातून सर्वप्रथम आलेला विदयार्थी/विदयार्थीनी | प्रत्येकी रुपये एक्कावन्न हजार रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये राज्यात सर्वप्रथम आलेला विदयार्थी / विदयार्थीनी | प्रत्येकी रुपये एक लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४) | विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गातून इयत्ता १२ वी परिक्षेमध्ये विभागीय परिक्षा मंडळातून सर्वप्रथम आलेला विदयार्थी/ विदयार्थीनी | प्रत्येकी रुपये एक्कावन्न हजार रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |

३. राज्यातून व विभागातून इ.१० वी व १२ वी च्या परिक्षेत जेवढे विद्यार्थी व विद्यार्थीनी सर्वप्रथम येतील त्यांना सदरहू पुरस्काराची रक्कम वर नमूद केल्याप्रमाणे प्रदान करण्यात यावी. आवश्यकता भासल्यास त्यासाठी येणाऱ्या अतिरिक्त खर्चाची मागणी शासनाकडे करण्यात यावी. कोणत्याही कारणास्तव सदरहू पुरस्काराची रक्कम विद्यार्थ्यांना विभागून देण्यात येऊ नये.

४. सदरहू पुरस्कार प्रदान करण्यासाठी आयोजित करावयाच्या समारंभासाठी, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र देण्यासाठी आणि सदर कार्यक्रमास दुरदर्शन व आकाशवाणीवर प्रसिध्दी देण्याकरिता येणाऱ्या खर्चाची मागणी दरवर्षी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र, पुणे यांनी शासनाकडे प्रस्ताव सादर करताना करावी. तसेच सदर कार्यक्रमास दुरदर्शन व आकाशवाणीवर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. त्याचप्रमाणे सदरहू पुरस्कार वितरण सोहळ्याचे आयोजन राज्य शासनाच्या मान्यतेने राज्यस्तरावर करावे. सदरहू कार्यक्रमाचे आयोजन व खर्चाबाबतचे सर्व अधिकार संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

५. या बाबींवर होणारा खर्च हा मागणी क्र.२२२५ अनुसूचित जाती, जमाती इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,०३ -मागासवर्गीयांचे कल्याण, ८०० - इतर खर्च (०६) बक्षिसे /पारितोषिके (०६)(०१)विजाभज प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरिता स्व.वसंतराव नाईक गुणवंत विद्यार्थी पुरस्कार, ०५ पारितोषके २२२५- D ७१६" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७४ अर्थ-७ दिनांक ५.१२.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०३०४११५२०२५५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Jalandhar Madhav Gosavi

Digitally signed by Jalandhar Madhav Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=010ebf10ad01f09c23969e1d80b48a44066a9122f464e555f80af35b24d57d93, cn=Jalandhar Madhav Gosavi
Date: 2017.03.04 11:51:57 +05'30'

( जा. मा. गोसावी )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्रयांचे सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्रयाचे सचिव.
४. सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय मुंबई
५. वित्त विभाग,( अर्थ-७ ) मंत्रालय मुंबई
६. नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई
७. संचालक,शिक्षण महाराष्ट्र राज्य,पुणे

८. चेअरमन,माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळ मुंबई / पुणे/ कोल्हापुर /नाशिक/ औरंगाबाद
९. लातूर/ अमरावती/नागपूर
१०.उपसंचालक शिक्षण - सर्व विभाग
११.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
१२.सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण.
१३.सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद
१४.महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ ( लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१५.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१६.कोषागार अधिकारी, मुंबई
१७.निवड नस्ती-विजाभज १